**सेवा प्रवेश नियम**
अगोदरच शासन सेवेत असलेल्यांना
नामनिर्देशनाने नियुक्तीसाठी वयोमर्यादा
विहित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग ,
शासन परिपत्रक, क्रमांक : एसआरव्ही-२००२/३७९/प्र.क्र.२२/०२/१२,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :१ नोव्हेंबर,२००३.

संदर्भ :- मुंबई नागरी सेवा, वर्गीकरण व सेवाप्रवेश नियम,१९३९.

## शासन परिपत्रक

मुंबई नागरी सेवा, वर्गीकरण व सेवा प्रवेश नियम -१९३९ मधील नियम-७ खालील टीप ३(ब) मधील तरतुदीनुसार नामनिर्देशनाद्वारे नियुक्तीसाठी शासन सेवेतील कर्मचा-याकरिता कमाल वयोमर्यादेच्या अटीमधून पूर्णतः सूट देण्यात आलेली आहे. शासकीय सेवेतील कर्मचा-यांकरिता अशी सूट यापुढेही देण्यात यावी किंवा कसे याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सर्वंकष विचार करुन शासनाने असा निर्णय घेतला आहे की, यापुढे राज्य सेवेतील पदांकरिता नामनिर्देशनाद्वारे नियुक्तीसाठी शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांच्याकरिता वयाची पूर्णतः सूट देण्यात येऊ नये. तथापि ज्या पदाकरिता काही वर्षांचा अनुभव आवश्यक आहे, अशा पदांकरिता सेवा प्रवेश नियमात कमाल वयोमर्यादा + अनुभवाचा कालावधी इतपत किंवा पदाच्या विशेषज्ञतेनुसार व आवश्यकतेनुसार वयाच्या ४५/५० वर्षांपर्यंत अशी वयोमर्यादा शासन सेवेतील अधिकारी/कर्मचारी यांच्याकरिता विहित करण्यात यावी.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी आपापल्या कक्षेतील पदांच्या सेवा प्रवेश नियमात त्यानुसार तरतुद करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(बा.बा.नारायणकर)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

(कृ.मा.प.....

रोटा प्रिंट/एच–879(5000–11–03)1